मे. इंद्रप्रस्थ जलक्रिडा व बोटींग केंद्रास वर्सोवा सात बंगला पोलीस स्टेशन बीट नं. ५ बांध ऐवजी जुहू येथे हॉलीडे इन व छत्रपती शिवाजी स्मारक येथे जलक्रिडा व नौका विहार करण्यास परवानगी देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग (पर्यटन)
शासन निर्णय क्र. एमटीसी २००२/१/प्रक्र.४६/पर्यटन,
दिनांक २० फेब्रुवारी, २००४.

**वाचा:-** १) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांचे पत्र क्र. एमटीडीसी/डीइव्ही/अेडीव्ही/टिडब्ल्यूएस/७२/९३, दिनांक २१.२.९४,

२) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मुंबअ/वहा-३/(६७)१८२०, दिनांक १९.९.९४,

३) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाइम बोर्ड यांचे प्रमाणपत्र क्र. एमएमबी/सीपीओ/टिआर-२/१६३४, १६३६ व क्र. १६३७, दिनांक १६.६.९७,

४) इंद्रप्रस्थ वॉटर स्पोर्ट व बोटींग सेंटर यांची दिनांक १८.१०.२००१, दिनांक ३.१.२००३, दिनांक ४.२.२००३,दिनांक ४.७.२००३ व दिनांक २६.८.२००३.

**प्रस्तावना :-** महाराष्ट पर्यटन विकास महामंडळाने त्यांचे पत्र क्र. एमटीडीसी /डीइव्ही / अेडीव्ही/ टीडब्ल्यूएस/ ७२/ ९३, दिनांक २१.२.९४ अन्वये मे. इंद्रप्रस्थ वॉटर स्पोर्टस व बोटींग केंद्रास वर्सोवा सात बंगला पोलीस स्टेशन बीट नं. ५ बीच जवळ जलक्रिडा व नौका विहारासाठी, परवानगी देण्यात आली होती.

२. परंतु वर्सोवा सात बंगला येथील सागर किनारा पर्यटकांच्या दृष्टीने धोकादायक असल्याने सदर जागा बदलून जुहू येथे हॉलीडे इन व छत्रपती शिवाजी स्मारक, येथे बदलून देण्याची सदर संस्थेची विनंती महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने मान्य करुन जुहू बीच येथे जलक्रिडा व नौका विहारास परवानगी दिली होती त्यानुसार जागा बदलून देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** मे. इंद्रप्रस्थ वॉटर स्पोर्टस अॅन्ड बोटींग सेंटर्स मुंबई यांना महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या दिनांक २१.२.९४ अन्वये वर्सोवा येथे जलक्रिडा व नौकाविहार करण्यासाठी दिलेली मंजुरी ऐवजी जुहूबीच येथील हॉलीडे इन व छत्रपती स्मारक येथे बदलून देण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन परवानगी देत आहे.

अटी :- १) पर्यटकांच्या जलक्रिडा प्रकल्पात कमीत कमी दहा जलक्रिडा साहित्य बोटी समाविष्ठ करणे आवश्यक असून त्यासोबत पान्टून जेटीज, बोट हाऊस, कपडे बदलण्याची खोली लॉकर्स, स्नानगृह, आंघोळीचा शॉवर, इ. आवश्यक सुखसोयी जलक्रिडा केंद्रावर सदर संस्थेने उपलब्ध करुन द्यावयाच्या असून विश्रांतीची जागा व उपहारगृह विशेष बाब म्हणून प्रकल्पाच्या ठिकाणी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

२) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मुबंअ/वहा-३/(६७)/१८२०, दिनांक १९.९.९४ च्या पत्रात नमूद केलेल्या सर्व अटी व शर्ती लागू होतील.

३) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाइम बोर्ड यांच्या दि. १६.६.९७ च्या प्रमाणपत्रातील अटी व शर्ती सुध्दा लागू होतील.

४) जलक्रिडा व नौकाविहार प्रकल्प सुरु करण्यापूर्वी, आवश्यक असलेल्या इतर सर्व संबंधित विभागाचे ना - हरकत प्रमाणपत्र घेण्यात यावे.

५) सदर परवानगी प्रथमत: पांच वर्षासाठी असून त्यानंतर नुतनीकरणाबाबत विचार करण्यात येईल. त्यासाठी संस्थेने मुदत संपण्यापूर्वी शासनाकडे अर्ज करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( र. य. नेतावडे)
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

मे. इंद्रप्रस्थ वॉटर स्पोर्टस ॲन्ड बोटींग सेंटर
एफ-४/ए-१०४ [illegible]धाम, सुंदरवन कॉम्प्लेक्स,
लोखंडवाला लिंक रोड समोर,
अंधेरी (पश्चिम), मुंबई-५३.

प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी-
१) प्रधान सचिव महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई,
६) मुख्य बंदर अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाइम्स बोर्ड, मुंबई-३८.